**महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA) ची स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१०/प्र.क्र.३४३/पदुम-४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २७ जुलै, २०१०**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्रातील पशुधनाची कमी उत्पादन क्षमता हा सर्वात महत्वाचा प्रश्न पशुसंवर्धन क्षेत्रात उद्‌भवत आहे. कमी उत्पादन क्षमतेमुळे शेतकऱ्यांना उत्पादन खर्च जास्त होऊन कमी नफा होतो. या समस्येचे निराकरण करण्यासाठी शेतकऱ्यांना विविध शास्त्रोक्त उत्पादन पध्दती आत्मसात करण्याची व प्रोत्साहन देण्याची गरज आहे. त्याचप्रमाणे जनावरांचे स्वास्थ्य व त्यापासून मिळणारे विविध उत्पादनांचे गुणनियंत्रण करणेही आवश्यक आहे. वरील प्रमाणे ध्येय साध्य करण्यासाठी प्रत्येक जनावरांची उत्पादन व प्रजनन क्षमता याची नोंद ठेवणे महत्वाचे आहे. त्याकरिता प्रत्येक जनावरांची राष्ट्रीय पातळीवर करण्यात येणाऱ्या नोंदणी प्रमाणे नोंदणी करून त्यांच्या प्रजनन स्वास्थ्य तसेच उत्पादन क्षमतेची नोंद होणे त्याचप्रमाणे प्रक्षेत्र नोंदणाी करणे गरजेचे आहे. जगभरातील अनेक देश अशा नोंदणी पध्दती वापरत आहेत व त्याकरिता संगणीकृत नोंदणीचा आधार घेवून त्यांच्या पशुधनाची उत्पादन क्षमता सातत्याने वाढल्याचे दिसून आले आहे. अशा प्रकारच्या नोंदणीचे कार्य करण्यासाठी महाराष्ट्र राज्यात **महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA)** ची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्यातील गुरांची उत्पादन व प्रजननक्षमता तसेच प्रक्षेत्र नोंदणी यांची नोंद ठेवण्यासाठी **"महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA)"** ची स्थापना करण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे. महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA) ची रचना खालील प्रमाणे राहील.

१. मुख्य कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ) -- **अध्यक्ष**
२. उपआयुक्त (सांख्यिकी), आयुक्त पशुसंवर्धन यांचे कार्यालय -- सदस्य
३. महाराष्ट्र शासनाने नामनिर्देशित केलेले महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापिठातील पशुवैद्यकीय शाखेतील एक वरिष्ठ तज्ञ - सदस्य
४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी महामंडळ, - सदस्य

५. पशुधन ओळख आणि नोंद योजनेशी संलग्न असलेला राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ (NDDB) द्वारा नामनिर्देशित केलेला एक प्रतिनिधी - सदस्य

६. महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान विभाग ह्यांनी नामनिर्देशित केलेला प्रतिनिधी - सदस्य

७. महाराष्ट्र शासनाने नामनिर्देशित केलेले आय आय टी (IIT) किंवा व्ही.जे.टी.आय (VJTI) या संस्थेच्या इलेक्ट्रॉनिक आणि संगणक या विभागांचे प्राध्यापक/विभाग प्रमुख - सदस्य

८. महाराष्ट्र राज्य सहकारी दुध उत्पादक महासंघ (महानंद) यांनी नामनिर्देशित केलेला प्रतिनिधी - सदस्य

९. विभागीय व्यवस्थापक(उपआयुक्त पशुसंवर्धन), गोठित रेत प्रयोगशाळा, खडकी, पुणे - सदस्य सचिव

**महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA) चे कार्य**

१. राज्यातील पशुधन ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी करणे.

२. पशुधन ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी (Premises Registration) ची पध्दत निश्चित करणे व नोंदणी मध्ये सुसुत्रता राखण्यासाठी. IntCAR च्या प्रतिनिधींशी संपर्क समन्वय ठेवणे.

३. पशुधन ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी करण्यासाठी नियमावली व मार्गदर्शिका तयार करणे तसेच NIC च्या पध्दतीने संगणकीय प्रणाली वापरून सदर योजना राबवणे.

४. या कामासाठी मानक पध्दतीची असाधारण क्रमांकाची मालिका (Unique numbering series allotment in a standardized fashion) निश्चित करणे. सदर कामासाठी प्लास्टिक / लेझर प्रिंट, बार कोडिंग, RFID या तंत्रज्ञानांचा वापर करणे.

**५.** पशुधनाच्या ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणीसाठी सॉफ्टवेअर विकसित करणे. जेणे करून सदरच्या तपशीलाचे विलिनिकरण राज्यस्तरीय जीपीएस (GPS) वर आधारित सॉफ्टवेअर ॲप्लीकेशन मध्ये करता येणे शक्य होईल. सदर कामासाठी सॉफ्टवेअर तयार करणाऱ्या उत्पादकांसाठी मार्गदर्शिका तयार करणे.

**६.** राज्यातील पशुधनाची तपशील ठेवण्यासाठी राज्यस्तरीय केंद्राची तसेच सर्व्हर्स (servers) ची निर्मिती करणे, पशुधनाची तपशील अद्यायावत ठेवणे याबाबत धोरण व मार्गदर्शक सुचना निश्चित करून ते हितसंबंधितांना पहावयास उपलब्ध करून देणे.

**७.** महाराष्ट्र राज्य पशुधन आरोग्य माहिती प्रणाली (MSAHS) ची निर्मिती व देखरेख करणे आणि ती संगणकीय प्रणालीद्वारे सामान्य जनतेपर्यंत पोहचविणे.

**८.** राज्यस्तरीय पशुधन ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणीच्या केंद्राची निर्मिती करून ती सामान्य जनतेपर्यंत पोहोचविणे.

**९.** पशुपालकांच्या स्वेच्छेनुसार पशुधनाची (गाई, म्हशी, वासरे, पैदाशीचे वळु, रेडे, शेळया, मेंढ्या इ.) ओळख व नोंदणी करणे. त्याचप्रमाणे खाली दर्शविल्या प्रमाणे प्रक्षेत्राची नोंदणी करणे.

- ५ व ५ पेक्षा जास्त दुभत्या गाई / म्हशी
- २० व २० पेक्षा जास्त शेळया / मेंढ्या
- ५ व ५ पेक्षा जास्त अश्व
- १० व १० पेक्षा जास्त ससे
- १० व १० पेक्षा जास्त वराह

- १० व १० पेक्षा जास्त इमु पक्षी
- १०० व १०० पेक्षा जास्त कुक्कुट पक्षी (लेअर / ब्रॉयलर)
- १०० व १०० पेक्षा जास्त लाव्ही पक्षी (बटेर / जापानीज क्वेल)

**१०.** पशुधनाच्या ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणीसाठी अर्जाचा नमुना, नोंदणीची कार्यपध्दती, मार्गदर्शक सुचना, इ. **"Online"** उपलब्ध करून द्याव्यात. तसेच नोंदणीचे शुल्क ECS पध्दतीने भरण्याची सुविधा उपलब्ध असावी.

**११.** पशुधनाची ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी कार्यप्रणालीचे महत्व विषद करण्यासाठी मोठ्या प्रमाणावर प्रसिध्दी व प्रचार करणे.

**१२.** पशुधनाचा नोंदणीकृत विमा उतरविण्यासाठी विविध विमा कंपन्यांशी समन्वय साधून विमा योजनेस प्रोत्साहन देणे.

**१३.** वरील प्रमाणे कार्य करण्यासाठी महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA) हे पशुधन ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणीचा व्यावसाईक तत्वावर वापर करून निधी गोळा करू शकेल. सुरूवातीच्या कालावधीत महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ त्यांच्या स्वतःच्या निधीतून सदर कार्यासाठी निधी उपलब्ध करून देऊ शकेल.

**१४.** या अंतर्गत नोंदणीचे शुल्क निश्चित करून नुतनीकरणाचा कालावधी निश्चित करणे.

**१५.** संस्थेचे मुख्यालय-गोठित रेत प्रयोगशाळा, खडकी, पुणे-०३ येथे राहील.

**१६.** पशुसंवर्धन विभागाच्या व महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाच्या अधिकारी / कर्मचारी यांच्या सहकार्याने सदर कार्यक्रम राबवण्यात यावा. यासाठी नवीन पद निर्मिती करण्यांत येवू नये. आवश्यकता असल्यास संस्थेच्या निधीतून Outsourcing द्वारे संस्थेचे कार्य करण्यात यावे.

**१७.** सदर कार्यासाठी संस्थेचे अध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या पदनामाने राष्ट्रीयकृत बँकेत संयुक्त खाते उघडण्यात यावे.

**१८.** संस्थेच्या निधीचा जमा खर्चचा अहवाल दर तीन महिन्याने व आवश्यकतेनुसार समिती पुढे ठेवून त्या समितीची मान्यता घेण्यात यावी. संस्थेमार्फत करण्यात येणाऱ्या कामास व त्या वरील खर्चास समितीची वेळोवेळी मान्यता घेण्यात यावी.

**१९.** संस्थेचे आर्थिक व्यवहार अध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने करण्यात यावे व दर वर्षी CA मार्फत संस्थेचे लेखा परिक्षण करून घेण्यात यावे.

**२०.** सर्व शासकीय व शासन पुरस्कृत योजनांसाठी MAIRA कडे पशुधनाची ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी करणे बंधनकारक राहील.

**२१.** राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत स्वयंसेवी / सेवाभावी संस्थामार्फत शेतकऱ्यांच्या दारात पुरविण्यात येणाऱ्या कृत्रिम रेतनाची नोंद व त्यापासून जन्मलेल्या वासरांची नोंद वरील कार्यप्रणालीद्वारे करणे स्वयंसेवी / सेवाभावी संस्थांवर बंधनकारक राहील.

**२२.** महाराष्ट्र शासनाने पशुधन ओळख व नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी संबंधी दिलेल्या निर्देशांचे पालन करणे.

**२३.** १ वर्षाच्या कालावधीनंतर सदर कार्यपध्दतीचे पुनर्विलोकन करून पशुधन ओळख  नोंदणी तसेच प्रक्षेत्र नोंदणी खाजगी व्यक्ती / संस्थांसाठी बंधनकारक करावे किंवा कसे याबाबतचा धोरणात्मक निर्णय यथावकाश शासन स्तरावरून घेण्यात येईल.

महाराष्ट्र ॲनिमल आयडेंटिफिकेशन ॲन्ड रेकॉर्डिग ॲथॉरिटी (MAIRA) कडे नोंदणी केलेल्या पशुपालकांना / प्रक्षेत्रांना शासनाच्या पशुसंवर्धन विभागामार्फत विविध शासकीय योजने अंतर्गत लाभ देण्यासाठी प्राधान्य देण्यात यावे व संबंधितांना वेळोवेळी पशुवैद्यकीय सेवा व तांत्रिक मार्गदर्शन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक **२०१००७२७१३०३१४००१** आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने, **सही/-**

**(राजेश अग्रवाल)**
**सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत -

आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
आयुक्त दुग्ध विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
कुलगुरू, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापिठ, नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दुध उत्पादन महासंघ, गोरेगांव, मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला
राष्ट्रीय दुग्ध विकास बोर्ड (NDDB), आनंद, गजराथ राज्य
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी महामंडळ, पुणे
प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (सर्व)